**सामाजिक न्याय विभागांतर्गत योजनांना प्रसिद्धी देणेबाबत.**

महाराष्ट्र शासन
सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,
शासन निर्णय क्रमांक : बीसीएच-२०११/प्र.क्र.२५६/मावक-४
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड, मंत्रालय (विस्तार),
मुंबई ४०००३२
दिनांक :- ३० जून, २०११

**प्रस्तावना :-**

समाजिक न्याय विभागांतर्गत योजनांची माहिती शहरी तसेच ग्रामीण भागातील मागासवर्गीय लोकांपर्यंत सर्वदूर पोहोचविण्यासाठी सदर योजनांना दरवर्षी प्रसिद्धी देण्यात येते. सन २०११-१२ या वर्षात सदर योजनांना प्रसिद्धी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सामाजिक न्याय विभागांतर्गत योजनांची माहिती मागासवर्गीय लोकांपर्यंत पोहोचविण्यासाठी काही निवडक योजनांची माहिती महाराष्ट्र लघुउद्योग विकास महामंडळ, मुंबई यांचे पत्र क्र.एमएमएसआयडीसी/आरसीटी/१०/प्रिंट मॅट/२०१०-११, दि.११.३.२०११ अन्वये करण्यात आलेल्या दर करारावरील अ.क्र.२१ वर दर्शविल्याप्रमाणे १० पानी रंगीत दिनदर्शिका, चार रंगी छपाई, सोबत अडकविण्यासाठी टिप पट्टीसह कागद १३० जीएमएस आर्ट पेपर आकार १८x२३ इंच असा एकच संच मे.सन इंडस्ट्रिज, सोलापूर या महाराष्ट्र लघुउद्योग विकास महामंडळ पंजीबद्ध संस्थेमार्फत राज्यातील सर्व स्थानिक स्वराज्य संस्था, शासकीय/ अनुदानित वसतीगृहे, शासकीय निवासी शाळा, शासकीय कार्यालये, महामंडळे या ठिकाणी सोबतच्या परिशिष्ट 'अ' मध्ये नमूद केल्याप्रमाणे वितरित करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

सदर योजनेंतर्गत खालील योजनांना प्रसिद्धी देण्यात येईल :-

१) सन २०११-१२ या शैक्षणिक वर्षापासून तालुकास्तरावर १०० शासकीय निवासी शाळा सुरु करणे.
२) अनुसूचिजत जातीच्या मुलामुलींसाठी विभागीय स्तरावर औद्योगिक प्रशिक्षण संस्था सुरु करणे.

३) शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमधून अनुसूचित जातीच्या उमेदवारांना व्यवसायिक प्रशिक्षण योजना, मागेल त्याला व्यावसायिक प्रशिक्षण देणे

४) घरकूल योजना

५) दलित वस्ती सुधारणा

६) शाहु, फुले व आंबेडकर दलित वस्ती स्वच्छता अभियान

७) कर्मवीर दादासाहेब गायकवाड अनुसूचित जाती व नवबौद्ध घटकांचे सबलीकरण व स्वाभिमान योजना

८) तालुका स्तरावर १०० विद्यार्थी क्षमतेची १०० वसतीगृहे सुरु करणे

९) आंबेडकर भवन निर्मिती व चैत्यभूमी विकास.

१०) आंतरजातीय विवाहास प्रोत्साहनपर आर्थिक सहाय्य

२. फोमशिट वरील १० पानी रंगीत दिनदर्शिका दर करारानुसार रु.१७५/- प्रती संच याप्रमाणे १,६४,७७० इतक्या प्रतींसाठी एकूण रु.२,८८,३४,७५०/- (रूपये दोन कोटी, अठ्ठयाऐंशी लाख, चौतीस हजार, सातशे पन्नास फक्त) इतक्या रकमेस मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

३. संचालक, समाजकल्याण, पुणे यांनी याबाबतच्या अटी व शर्ती निश्‍चित करून संबंधित संस्थेशी महाराष्ट्र लघुउद्योग विकास महामंडळाच्या दर करार /दर निश्‍चिती नुसार करारनामा करावा व त्याप्रमाणे कार्यादेश द्यावेत. तसेच दिनदर्शिकेच्या परिशिष्ट 'अ' मध्ये नमूद केलेल्या कार्यालयांना एकूण ५,१७,३०३ संचाचे वितरण करण्याबाबतचा तपशिल परिशिष्ट 'ब' मध्ये नमूद करण्यात आलेला आहे. संचाच्या प्रती वितरित झाल्या आहेत किंवा नाही याची खातरजमा संचालक, समाजकल्याण, पुणे यांनी करावी व तद्नंतरच सदर संस्थेस रक्कम अदा करण्यात यावी. याकरीता संचालक, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. याबाबत होणारा खर्च २२२५ अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागासवर्गीयांचे कल्याण ०१, अनुसूचित जातीचे कल्याण, ००१, संचालन व प्रशासन, (०३) (०४) अनुसूचित व नवबौद्ध घटकांसाठीच्या योजनांना समाजकल्याण संचालनालयामार्फत व्यापक प्रसिद्धी देणे (२२२५.३७२.५), २८, जाहिराती व प्रसिद्धी मागणी क्र.एन-३ या लेखाशिर्षाखाली सन २०११-१२ या वित्तीय वर्षासाठी मंजूर केलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

५. सदर आदेश महाराष्ट्र वित्तीय अधिकार नियम, भाग - पहिला, उप विभाग-२ अन्वये प्रशासकीय विभागाला प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

६.                हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या बेव साईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक क्रमांक २०११०६३०१२४६५२००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**(उ. शि.लोणारे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत :-
मा.मंत्री, सामाजिक न्याय यांचे खाजगी सचिव,
मा.राज्यमंत्री, सामाजिक न्याय यांचे खाजगी सचिव,
मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई
महालेखापाल (लेखापरिक्षा/लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई, नागपूर
मा.सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई,
संचालक, समाज कल्याण संचालनालय, म.रा. पुणे
सर्व जिल्हाधिकारी
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
सर्व विभागीय समाजकल्याण अधिकारी
सर्व विशेष जिल्हा समाजकल्याण अधिकारी
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
सर्व समाजकल्याण अधिकारी गट-अ, जिल्हा परिषद
सचिव / अध्यक्ष, सर्व संबंधित संस्था,
वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
निवड नस्ती (मावक-४)

सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्रमांक : बीसीएच-२०११/प्र.क्र.२५६/मावक-४
दि.३०.६.२०११ या सोबतचे परिशिष्ट

**परिशिष्ट " अ "**

| अ.क्र. | कार्यालयाचे नाव | कार्यालयांची संख्या | एकूण संच संख्या |
|---|---|---|---|
| १ | मा.मंत्री, राज्यमंत्री, सामाजिक न्याय | २ | १० |
| २ | मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य (स्वीय सहायकासह) | २ | ४ |
| ३ | मा.सचिव, सामाजिक न्याय (स्वीय सहायकासह) | २ | ४ |
| ४ | उप सचिव/अवर सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग / स्वीय सहायक | १० | २० |
| ५ | संचालक, समाजकल्याण संचालनालय, पुणे / अतिरिक्त संचालक | २ | २ |
| ६ | समाजकल्याण संचालनालय, पुणे / स्वीय सहायक | १० | १० |
| ७ | वि.स.क.अ./वि.जि.स.क.अ./स.क.अ.जि.प.-गट-अ (सर्व) (प्रती ३) | ७७ | २३१ |
| ८ | सभापती स.क.समिती / स्वीय सहायक | ३४ | ६८ |
| ९ | गट विकास अधिकारी, पंचायत समिती / कार्यालये | ७०२ | ७०२ |
| १० | सर्व शासकीय वसतिगृहे | २७३ | ५४६ |
| ११ | सर्व अनुदानित वसतिगृहे | २३८८ | ४७७६ |
| १२ | सर्व अनुसूचित जाती आश्रमशाळा | १५ | ३० |
| १३ | शासकीय निवासी शाळा (२ प्रती) | ४४ | ८८ |
| १४ | सर्व नगर परिषद कार्यालये | २२२ | ४४४ |
| १५ | सर्व ग्रामपंचायत कार्यालये (प्रत्येकी ५) पैकी तलाठी कार्यालय १ प्रत, अंगणवाडी १ प्रत, प्राथमिक आरोग्य केंद्र १ , सरपंच कार्यालय १ प्रत व ग्रामसेवक कार्यालय १ प्रत | २७९४९ | १३९७२५ |
| १६ | सामाजिक न्याय विभागांतर्गत विविध महामंडळाची विभागीय व जिल्हा कार्यालये, उदा.अण्णाभाऊ साठे महामंडळ | ३५ | ७० |

| | | | |
|---|---|---|---|
| १७ | दलित मित्र / लोक शाहीर अण्णाभाऊ साठे /संत रोहीदास पुरस्कारार्थी व संख्या प्रत्येक पुरस्कारार्थी व संस्थेस सन २००७-०८ अखेरचा आकडेवारीनुसार प्रत्येकी १० नग अपेक्षित पुरस्कारार्थी - १५०<br>सदर १० प्रती पैकी ९ प्रती दलितमित्रा समवेत काम करणाऱ्या स्वयंसेवी संस्था व समाज सुधारकांना वितरीत करण्यात यावे | १७४३ | १७४३० |
| १८ | सर्व जिल्हाधिकारी व मुख्य कार्यकारी अधिकारी / कार्यालये (प्रत्येकी - ५) | ७० | ३५० |
| १९ | समाजकार्य महाविद्यालये (प्रत्येकी - ५) | ५२ | २६० |
| | एकूण | ३३६३२ | १६४७७० |

सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय क्रमांक : बीसीएच-२०११/प्र.क्र.२५६/मावक-४
दि.३०.६.२०११ या सोबतचे परिशिष्ट

## परिशिष्ट " ब "

| अ.क्र. | योजनांची प्रसिद्धी देण्याचे ठिकाण / कार्यालयाचे नाव | महामंडळाद्वारे प्रसिद्धी साहित्य वितरित करण्याचे ठिकाण |
|---|---|---|
| १ | मा.मंत्री, राज्यमंत्री, (सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग), मंत्रालय, मा.सचिव, उप सचिव, अवर सचिव (सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग), मंत्रालय यांचे कार्यालय | सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई |
| २ | समाजकल्याण संचालनालय, पुणे | समाजकल्याण संचालनालय, पुणे |
| ३ | विभागीय समाजकल्याण अधिकारी कार्यालये | संबंधित विभागीय समाजकल्याण अधिकारी कार्यालय |
| ४ | विशेष जिल्हा समाजकल्याण अधिकारी कार्यालय, शासकीय वसतिगृहे, समाजकार्य महाविद्यालय, सामाजिक न्याय भवन, दलित मित्र, संत रोहिदास इ. पुरस्कार्थी संस्था, कनिष्ठ व वरिष्ठ महाविद्यालये, शासकीय निवासी शाळा, नगर परिषद / पालिका | संबंधित जिल्ह्याचे विशेष जिल्हा समाजकल्याण अधिकारी यांचे कार्यालय |
| ५ | जिल्हा समाजकल्याण अधिकारी, गट-अ यांचे कार्यालय, सभापती समाजकल्याण समिती, जिल्हा परिषद यांचे कार्यालय, पंचायत समिती, ग्राम पंचायत कार्यालय, अनुदानित वसतिगृहे, समाजमंदिरे, अनुदानित आश्रमशाळा. | संबंधित जिल्ह्याचे जिल्हा समाजकल्याण अधिकारी, गट-अ यांचे कार्यालय |
| ६ | सामाजिक न्याय विभागांतर्गत विविध महामंडळे | संबंधित महामंडळाचे मुख्य / जिल्हा स्तरीय कार्यालय |
| ७ | जिल्हाधिकारी व मुख्य कार्यकारी अधिकारी कार्यालय | संबंधित जिल्हाधिकारी व मुख्य कार्यकारी अधिकारी, कार्यालय |